प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी यांना शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांक : जीटीआय-२०१०/(१४१/१०)/तांशि-३

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २७ ऑगस्ट, २०१०.

वाचा:- १) शासन निर्णय क्र.जीईसी-२००८/(४५८/०८)/तांशि-१, दि.२४/०३/२००९

२) शासन निर्णय क्र. जीईसी -२००९/(१०७/०९)/तांशि-४, दि. १५.०६.२००९

३) संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र.४(३) /आस्था/२०१०/१८५, दि.२५/०८/२००९

**प्रस्तावना :** शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.जीईसी -२००९/(१०७/०९)/तांशि-४, दि. १५.०६.२००९, या शासन निर्णयान्वये शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी येथे नवीन औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय सुरू करण्यास परवानगी देण्यात आली आहे. या नवनिर्मीत संस्थामधील प्रशासकीय व आर्थिक व्यवहार सुरळीत होण्यासाठी प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी यांना शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी या संस्थेचे प्राचार्य पद मंजूर होईपर्यंत महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५(३) नुसार संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भ क्रमांक ३ नुसार सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी या संस्थेतील प्रशासकीय व आर्थिकबाबी पूर्ण करण्यासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी यांना शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी या संस्थेचे "आहरण व संवितरण "अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी या संस्थेच्या लेखा व प्रशासन बाबीसंबंधी विहीत नमुन्यातील नोंदणी पुस्तके स्वतंत्रपणे ठेवण्याची जबाबदारी प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी यांची राहील.

२) सदर नवीन शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालयातील प्राचार्य पदाची स्वतंत्र पदनिर्मिती झाल्यावर लेखा व प्रशासन विषयक बाबीसंबंधी विहीत नमुन्यातील नोंदणी पुस्तके कोणतीही त्रुटी न ठेवता नवीन प्राचार्यांकडे विना विलंब हस्तांतरित करण्याची जबाबदारी उपरोक्त प्राचार्य यांची राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळ www.maharashtra.govt.in वर ठेवण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201008271532270001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( डॉ.अभय वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र - नागपूर/ मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी
प्राचार्य, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी
नियोजन विभाग / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती/तांशि-३